**श्री क्षेत्र निरा नृसिंहपूर, पुणे तिर्थक्षेत्र विकास आराखड्यातील कामांसाठी निधी उपलब्धतता व कार्यान्वयनाबाबत.....**

---

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्र. : बैठक-२०१६/३/प्र.क्र.२०२/पर्यटन**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २८ एप्रिल, २०१७

| | |
|---|---|
| **वाचा :** | १. शासन निर्णय नियोजन विभाग क्र.तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का-१४४४, दि.४.६.२०१५.<br>२. शासन निर्णय नियोजन विभाग क्र.तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का-१४४४, दि.१९.७.२०१६.<br>३. शासन निर्णय पर्यटन सांस्कृतिक कार्य विभाग क्र. :बैठक-२०१६/३/ प्र.क्र.२०२/पर्यटन, दि.१६.११.२०१६. |

**शासन निर्णय :-**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीने दि. ०२ मार्च २०१६, रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार शासन निर्णय, पर्यटन सांस्कृतिक कार्य विभाग क्र. :बैठक-२०१६/३/प्र.क्र.२०२/पर्यटन, दि.१६.११.२०१६ अन्वये श्री क्षेत्र निरा नृसिंहपूर येथील श्री लक्ष्मी नृसिंह देवस्थान व सभोवतालचा परिसर तिर्थक्षेत्र व पर्यटन स्थळ विकास आराखड्यास सदर शासन निर्णयातील नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन मान्यता देण्यात आलेली आहे.

२. दरम्यान शासन निर्णय नियोजन विभाग क्र.तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का-१४४४, दि.१९.७.२०१६ नुसार राज्यातील तीर्थक्षेत्र, पर्यटन स्थळ परिसर विकास आराखडा अंतिम करणे व अंमलबजावणीबाबत धोरण / मार्गदर्शक तत्त्वे यांच्या अनुषंगाने तरतुदी / निकष स्पष्ट करण्यात आलेले आहेत. सदर शासन निर्णय विचारात घेऊन नियोजन विभागाच्या विचारविनियमानंतर शासन निर्णय पर्यटन सांस्कृतिक कार्य विभाग क्र. :बैठक-२०१६/३/प्र.क्र.२०२/पर्यटन, दि.१६.११.२०१६ मधील "अट क्र.१३ :- शिखर समितीच्या बैठकीतील निर्णयाप्रमाणे या प्रकल्पाच्या अनुषंगाने आवश्यक तो निधी नियोजन विभागाने स्वतंत्र उपलब्ध करुन द्यावयाचा आहे." ही अट वगळण्यात येत आहे आणि त्याऐवजी "अट क्र.१३ :- विकास आराखड्यामध्ये ज्या कामांचा समावेश शासनाकडून कार्यान्वित असलेल्या चालू योजनेमधून करणे शक्य आहे, अशा कामांसाठी त्या त्या प्रशासकीय विभागाच्या चालू योजनेमधून निधी उपलब्ध करुन कामांचे कार्यान्वयन देखिल त्या त्या प्रशासकीय विभागामार्फत / संबंधित कार्यान्वयन यंत्रणेमार्फत करण्यात यावे" ही अट समाविष्ट करण्यात येत आहे.

३. वरीलप्रमाणे अट समाविष्ठ केल्यामुळे जिल्हाधिकारी, पुणे तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती यांनी विकास आराखड्यामध्ये ज्या कामांचा समावेश शासनाकडून कार्यान्वित असलेल्या चालू योजनेमधून करणे शक्य आहे, अशा कामांसाठी त्या त्या प्रशासकीय विभागाच्या चालू योजनेमधून निधी उपलब्ध करुन घेण्याबाबत तसेच कामांचे कार्यान्वयन देखिल त्या त्या प्रशासकीय विभागामार्फत / संबंधित कार्यान्वयन

यंत्रणेमार्फत करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी. संबंधित प्रशासकीय विभागांनी निधी उपलब्धतेबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४२८१२५१०८८९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lakhote Ravindra Laxmikant

Digitally signed by Lakhote Ravindra Laxmikant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Lakhote Ravindra Laxmikant
Date: 2017.04.28 12:52:49 +05'30'

(र.ल.लखोटे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

| | |
|---|---|
| मा. राज्यपाल यांचे सचिव<br>मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव<br>मा. मंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव<br>मा. राज्यमंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव<br>सर्व मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव<br>मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-४०००३२<br>सर्व मा. संसद सदस्य / विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य<br>मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक<br>मा. पोलिस महासंचालक, महाराष्ट्र<br>सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव<br>व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई<br>विभागीय आयुक्त, पुणे<br>जिल्हाधिकारी, पुणे<br>मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे<br>पोलीस आयुक्त, पुणे<br>पोलीस अधिक्षक, पुणे<br>महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, | उप सचिव (सांका ३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग<br>जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे<br>प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, पुणे<br>अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे<br>अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे<br>अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य वितरण कंपनी, पुणे<br>अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे<br>सहाय्यक संचालक, राज्य पुरातत्त्व, पुणे<br>सहाय्यक संचालक, नगर रचना, पुणे<br>उप विभागीय अधिकारी, बारामती, जि.पुणे<br>पर्यटन व सांस्कतिक कार्य विभागातील सर्व कार्यासने<br>निवडनस्ती, पर्यटन. |

***